उपजिल्हा रूग्णालय, कणकवली, जि.सिंधुदुर्ग येथील बांधकामांच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१५/ प्र.क्र.१८/ आरोग्य-४.

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ११ मार्च, २०१५.

**वाचा**

**१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/ टे-६/ बांध.कणकवलीदुरू/ ३-६८०-६८२/ १५, दि.२९.०१.२०१५.**

**शासन निर्णय**

उपजिल्हा रूग्णालय, कणकवली, जि.सिंधुदुर्ग येथील विविध बांधकामांची एकूण रूपये ९०,४८,९००.०० इतक्या किंमतीची एकूण ६ अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेसाठी संचालक, आरोग्य सेवा , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांच्याकडून शासनास प्राप्त झाली आहेत. सदर अंदाजपत्रके सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत असून या एकूण ६ अंदाजपत्रकांतील कामांचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | कामाची अंदाजित रक्कम रूपये लक्ष |
|---|---|---|
| १ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथे आर.सी.सी. रॅम्प व कव्हरचे बांधकाम करणे. | १७,१९,६००.०० |
| २ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथे गाडीसाठी गॅरेज बांधकाम करणे. | १३,२३,९००.०० |
| ३ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथे ट्रामा केअर युनिटचे वर स्टोअर रूम बांधकाम करणे. | २३,०४,३००.०० |
| ४ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथील जुन्या इमारतीचे वॉटर प्रुफींग करणे. | १५,९५,९००.०० |
| ५ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथे आतील रस्त्याचे नुतनीकरण व डांबरीकरण करणे. | ७,३४,०००.०० |
| ६ | उपजिल्हा रूग्णालय, कणकवली येथील प्रशासकीय कार्यालयाच्या जागी जनरल वॉर्ड बनविणे. | १३,७१,२००.०० |
| | **एकूण** | **९०,४८,९००.००** |

उपरोक्त उपजिल्हा रूग्णालय, कणकवली, जि.सिंधुदुर्ग येथील विविध बांधकामांच्या एकूण रूपये ९०,४८,९००/- (अक्षरी रूपये नव्वद लक्ष अठ्ठेचाळीस हजार नऊशे फक्त ) इतक्या किंमतीच्या एकूण ६

अंदाजपत्रक व आराखडे यांना खालीलप्रमाणे नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) या कामांसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिका-यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) निधी अर्थसंकल्पित झाल्याशिवाय कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात यावा.

**मागणी क्र.एच-८**

| | |
|---|---|
| ४२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य) |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| (१) ( अ )- | पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती |
| (००) (०१)- | मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ ) |
| ५३- | मोठी बांधकामे |

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१४५९३२०८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.11 16:23:00 +05'30'

**संजय कमलाकर**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
४. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रूग्णालय, सिंधुदुर्ग.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,कुडाळ,जि.सिंधुदुर्ग.

६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदुर्ग.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.